20100720140932001

प्रादेशिक योजना - औरंगाबाद - जालना
शेती विभागात Ancillary Servic Industries अनुज्ञेय करण्यासाठी विकास नियंत्रण नियमावलीत फेरबदल करणेबाबत....

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्र. टिपीएस-३००९/४२/प्र.क्र.३७/२००९/नवि-३०.
मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक - २३ जून, २०१०.

शासन निर्णय :- सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिद्ध करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(शिवाजी पाटणकर)
अवर सचिव

प्रति,
प्रधान सचिव, सहकार व पणन विभाग, मंत्रालय मुंबई.
विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
जिल्हाधिकारी, औरंगाबाद.
जिल्हाधिकारी, जालना.
संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
उप सचिव (नगररचना) नगरविकास विभाग मंत्रालय मुंबई-३२
उप संचालक नगररचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
सहायक संचालक नगररचना, औरंगाबाद शाखा, औरंगाबाद.
नगर रचनाकार, जालना शाखा, जालना.
व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद.
त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची सूचना महाराष्ट्र शासन राजपत्राच्या औरंगाबाद विभागीय पुरवणीमध्ये प्रसिद्ध करुन त्याच्या ५ प्रती या विभागास व संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पाठवाव्यात.
कक्ष अधिकारी, (न.वि-२९) नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
त्यांना विनंती करण्यांत येते की, सोबतची अधिसुचना शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यांत यावी .
निवड नस्ती, नवि-३०.

NOTIFICATION-2010.lwnF

**प्रादेशिक योजना - औरंगाबाद - जालना**
शेती विभागात Ancillary Service Industries
अनुज्ञेय करण्यासाठी विकास नियंत्रण नियमावलीत फेरबदल
करणेबाबत....

**अधिसूचना**
**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : २३ जून, २०१०.**

**क्र.टिपीएस-३००९/४२/प्र.क्र.३७/०९/नवि-३०**

ज्याअर्थी, औरंगाबाद-जालना जिल्हयाची प्रादेशिक योजना (यापुढे उक्त प्रादेशिक योजना असे उल्लेखिलेली) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनिय१९६६ (सन १९६६ चा महाराष्ट्र अधिनियम ३७ वा) यापुढे (उक्त अधिनियम असा उल्लेखिलेली ) च्या कलम १५ अन्वये महाराष्ट्र शासनाच्या नगर विकास विभागाकडील, अधिसूचना क्र.आरपीए-११७६/३७३८/युडी-५ दि.२३/१०/१९८० अन्वये (यापुढीले उल्लेख उक्त अधिसूचना असा उल्लेख करण्यात आला आहे) मंजूर केली असून ती दि.०१/१२/१९८० पासून अंमलात आलेली आहे;

आणि उक्त मंजूर प्रादेशिक योजनेतील नियम क्र.१९.९ नुसार शेती तथा ना विकास विभागामध्ये शेती व शेतीपूरक वापर जसे की,फलोउत्पादन, पोल्ट्री, डेअरी फार्म व स्टड फार्म, वराहपालन, गुरे पैदास केंद्र, नर्सरी इत्यादी वापर अनुज्ञेय आहेत.

आणि ज्याअर्थी, मंजूर प्रादेशिक योजनेनुसार शेती तथा नाविकास विभागात कृषि उत्पन्न व्यापार व पणन व्यवस्थापनाच्या उत्पादनामधील फुले, फळे, भाजीपाला, पोल्ट्री उत्पादने, मत्स्योद्योग या उत्पादनांच्या व्यापार व विपणनासाठी सुविधा निर्माण करण्याकरिता शेत जमीन विकसित करणाऱ्या संस्था / व्यक्ती / कंपनी यांना कृषि प्रयोजनाशी निगडित Collection Center, Auction Hall, Godowns, Grading Services and Packing Units, Knowledge Parks, Cold Storages, Utility Services like (Banking), Insurance Service, Post Office Services या सर्व व्यवस्थेचा Service Industries म्हणून वापर एकुण क्षेत्रामधून प्रादेशिक योजनेच्या प्रस्तावाखालील क्षेत्र वगळून उर्वरित क्षेत्राचे २०% पर्यंत (०.२० च.क्षे.नि.) बांधकाम अनुज्ञेय करणे आवश्यक आहे आणि सदर वापर उपरोक्त नियमांचे अ.क्र. १९ नुसार नव्याने अंतर्भूत करण्यासाठी उक्त प्रादेशिक योजनेत फेरबदल करणे आवश्यक आहे, असे शासनाचे मत आहे (यापुढे उक्त फेरबदल असा उल्लेख केलेला)

आणि ज्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम २० पोटकलम (३) च्या तरतुदीनुसार शासन सूचना, नगर विकास क्र. समक्रमांक, दि.४/२/२००९ अन्वये उक्त फेरबदलाबाबत सर्व संबंधितांकडून विहित मुदतीत सुचना/हरकती मागविण्यात आल्या व विहित मुदतीत प्राप्त होणाऱ्या सूचना / हरकतींवर संबंधितांना सुनावणी देणेकरिता व त्यावरील अहवाल शासनास सादर करणेकरिता अधिकारी म्हणून उपसंचालक, नगर रचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांची नियुक्ती करण्यात आली (यापुढे उक्त अधिकारी असे उल्लेखिलेला) सदर सुचना महाराष्ट्र शासन राजपत्र औरंगाबाद विभागीय पुरवणीत दि.९/४/२००९ वर प्रसिध्द झाली आहे;

आणि ज्याअर्थी उक्त अधिका-याने त्यांचा अहवाल त्यांचे पत्र क्र.प्रादेशिक योजना औरंगाबाद-जालना/फेरबदल-२०/ विनिनि/उसंऔ/२०३३, दि.१०/०९/२००९ अन्वये शासनास सादर केलेला आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त अधिकाऱ्यांच्या प्राप्त अहवालावर संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेतल्यानंतर उक्त फेरबदल आवश्यक असून त्यास मान्यता देणे आवश्यक आहे, असे शासनाचे मत झाले आहे;

त्याअर्थी, आता उक्त अधिनियमाचे कलम २० चे पोटकलम (४) व त्या अनुषंगाने प्राप्त अधिकारांत शासन उक्त फेरबदल प्रस्तावास मान्यता देत आहे व त्यासाठी दि.२३/१०/१९८० च्या प्रादेशिक योजना मंजुरीच्या अधिसूचनेत खालील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे-

उक्त प्रादेशिक योजनेच्या विकास नियंत्रण नियमावलीतील नियम क्र.१९.९ मधील शेती/ना-विकास विभागात अनुज्ञेय वापराच्या नियमावलीत नव्याने खालीलप्रमाणे समाविष्ट करण्यात येत आहे.

## नोंद

"कृषि उत्पन्न व्यापार व पणन व्यवस्थापनाच्या उत्पादनामधील फुले, फळे, भाजीपाला, पोल्ट्री उत्पादने, मत्स्योद्योग या उत्पादनांच्या व्यापार व विपणनासाठी सुविधा निर्माण करण्याकरिता शेत जमीन विकसित करणाऱ्या संस्था / व्यक्ती / कंपनी यांना कृषि प्रयोजनाशी निगडित Collection Center, Auction Hall, Godowns, Grading Services and Packing Units, Knowledge Parks, Cold Storages, Utility Services like (Banking), Insurance Service, Post Office Services या सर्व व्यवस्थेचा Service Industries म्हणून वापर एकूण क्षेत्रामधून प्रादेशिक योजनेच्या प्रस्तावाखालील क्षेत्र वगळून उर्वरित क्षेत्राचे २०% पर्यंत (०.२० च.क्षे.नि.) बांधकाम अनुज्ञेय होईल"

टीप :- अ) उक्त अधिसूचना खालील कार्यालयांमध्ये नागरिकांच्या अवलोकनार्थ कामकाजाच्या दिवशी कार्यालयीन वेळेत उपलब्ध राहील.

१) उपसंचालक, नगर रचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद म्हाडा बिल्डिंग, दुसरा मजला, बाबा पेट्रोल पंपाजवळ, स्टेशन रोड, औरंगाबाद-४३१००१.

२) जिल्हाधिकारी, औरंगाबाद.

३) जिल्हाधिकारी, जालना.

४) सहायक संचालक, नगर रचना, औरंगाबाद शाखा, औरंगाबाद.

५) नगररचनाकार, जालना शाखा, जालना.

ब) सदर अधिसूचना शासनाच्या WWW.urban.maharashtra.gov.in वेबसाईटवर प्रसिद्ध करण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(शिवाजी पाटणकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन,